राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता पीआयपी अंतर्गत विविध प्रकारच्या छपाई खरेदीस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२२/प्र.क्र.०४/आरोग्य-७**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २१ जानेवारी, २०२२

**वाचा :-**

(१) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण माताबाल संगोपण कार्यालय, पुणे यांचे पत्र क्रमांक : राकुकका/खरेदी २०२१-२२ कक्ष १५ क/खरेदी ५०४५६-४५७/२०२१, दिनांक : ०९.०८.२०२१.

(२) सहसंचालक, आरोगय सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक : ४५४६-५० आसेआ/खरेदी कक्ष/सन २०२१-२२ रा.आ. अभियान अनुदान/छपाईस प्रशासकीय मान्यता/ २०२१, दिनांक : ११.०१.२०२२.

(३) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी दिनांक : २६.१२.२०२१ अन्वये मंजूर केलेली टिप्पणी,

**प्रस्तावना :-**

अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण माताबाल संगोपण कार्यालय, पुणे यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (१) अन्वये आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना केंद्र शासनाच्या दिनांक : ०९ जुलै, २०२१ च्या मंजूर कृती आराखड्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता राष्ट्रीय आरोग्य अभियान (पी.आय.पी.) अंतर्गत आरएमएनसीएस + ए कार्यक्रमांतर्गत लेखाशिर्ष निहाय विविध प्रकारच्या छपाई खरेदीस रुपये ९०४.०१ लक्ष इतके अनुदान प्राप्त झाल्याचे कळविले आहे. तद्नुषंगाने, विषयाधीन प्रयोजनार्थ छपाई खरेदीच्या प्रक्रीयेस आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आारोग्य अभियान, मुंबई यांनी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत आणि पुढील खरेदी प्रक्रीया आयुक्तालयाच्या स्तरावरुन करण्याबाबत कळविले आहे.

सदर प्रकरणी सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (२) अन्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता राष्ट्रीय आरोग्य अभियान (पी.आय.पी.) अंतर्गत आरएमएनसीएस + ए कार्यक्रमांतर्गत लेखाशिर्ष निहाय विविध प्रकारच्या छपाई खरेदीस आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी संदर्भाधीन क्रमांक (३) च्या

मंजूर टिपणीन्वये रुपये ८६६.७४ लक्ष (रुपये आठ कोटी सहासष्ट लक्ष चौ-याहत्तर हजार फक्त) इतक्या खर्चास मंजूरी दिल्याचे कळविले आहे. त्यास अनुसरुन, शासन स्तरावरुन प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या दिनांक : २६.१२.२०२१ च्या मंजूर टिप्पणीनुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता राष्ट्रीय आरोग्य अभियान (पी.आय.पी.) अंतर्गत आरएमएनसीएस + ए कार्यक्रमांतर्गत अर्थशिर्ष निहाय (FMR Code) विविध प्रकारच्या छपाई खरेदीस रुपये ८६६.७४ लक्ष (रुपये आठ कोटी सहासष्ट लक्ष चौ-याहत्तर हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. यासाठी, विविध प्रकारच्या छपाई करावयाच्या FMR Code निहाय येणा-या खर्चाच्या तपशीलाचे विवरण पुढील प्रमाणे आहे :-

**विवरण**

| Name of Scheme | FMR Code | Name of Item's/Particular | Proposed Qty. | Approx. Rate Per Unit | Proposed Amount (In Lakh) |
|---|---|---|---|---|---|
| AMB Programme | 12.2.5 | AMBC Compliance Card | 22,55,800 | 1.00 | 22.56 |
| | | AMB Poster | 3,06,580 | 9.44 | 28.94 |
| Family Planning | 12.3.3 | Female & Male Sterilization Service Book | 5,00,000 | 6.00 | 30.00 |
| RKSK | 12.4.1 | Peer Educator Kit | 9,987 | 165.20 | 16.50 |
| | | Peer Educator Diary | 9,987 | 23.60 | 2.36 |
| WIFS | 12.4.2 | WIFS Card | 15,20,002 | 1.06 | 16.11 |
| Routin Immuniza-tion | 12.10.1 | MCP Card | 26,39,400 | 15 | 395.91 |
| | | Vaccine Distrribution register | 7,000 | 150 | 10.50 |
| | | Tally sheet Register | 28,000 | 50 | 14.00 |
| | | Temperature Monitoring Logbook Register | 4,500 | 85 | 3.83 |
| | | Indent Form register | 4,500 | 100 | 4.50 |
| | | Vaccine and Logistic issue Register | 400 | 150 | 0.60 |
| | | Vaccine Arrival report Register | 10 | 250 | 0.025 |
| | | Product Arrival report Register | 10 | 250 | 0.025 |
| | | State Monthly stock book postion Register | 10 | 250 | 0.025 |
| RCH | 12.9.2 | RCH Register Version 2.0 | 1,28,346 | 250 | 320.86 |
| **Total Amount (Rs. In lakh)..** | | | | | **866.74** |

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता राष्ट्रीय आरोग्य अभियान (पी.आय.पी.) अंतर्गत आरएमएनसीएस + ए कार्यक्रमांतर्गत रुपये ८६६.७४ लक्ष (रुपये आठ कोटी सहासष्ट लक्ष चौ-याहत्तर हजार फक्त) इतक्या छपाई खरेदीच्या खर्चास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

(१) सदर विविध प्रकारच्या छपाईची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी. सदर प्रक्रिया खरेदी सहसंचालक, आरोगय सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्या स्तरावर करण्यात यावी.

(२) सदरहू छपाई खरेदी गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. छपाई खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, छपाई खरेदी ही कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केली नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच छपाई खरेदीची प्रक्रीया राबविण्यात यावी.

(३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक : भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

(४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

(५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (Specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

(६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

(७) सदरहू खरेदी प्रक्रियेसाठी होणारा खर्च केंद्र शसनाने दिनांक : ०९ जुलै, २०२१ अन्वये मंजूर केलेल्या कृती आराखड्यातील पीआयपीला दिलेल्या मान्यतेनुसार करण्यात यावा.

(८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

(९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्र शासनाच्या कृती आराखड्यातील मार्गदर्शक सूचनांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

(१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र. ४ नियम क्रमांक-७ समोरील स्तंभ क्रमांक-६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते १० येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई व सहसंचालक, आरोगय सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील.

०२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२०१५५१२१४०१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.01.21 14:45:53 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

(१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(२) सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
(३) सहसंचालक, आरोगय सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
(४) संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई.
(५) संचालक, आारोग्य सेवा (२), पुणे.
(६) संचालक (वित्त व लेखा) आरोग्य सेवा, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

(७) सहसंचालक (तांत्रिक). राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(८) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग (औषधे-१), मंत्रालय, मुंबई.
(९) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा-१/लेखा व अनुज्ञेयता-१), मुंबई.
(१०) निवडनस्ती (आरोग्य-७), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.